परभणी जिल्हयात अल्पसंख्याक
समाजातील मुलींसाठी वसतीगृह बांधण्यासाठी
<u>प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्यांक विकास विभाग,
**शासन निर्णय** क्रमांकः अविवि-२००९/प्र.क्र.१५(१)/का.८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांकः २७ मार्च, २०१०.

वाचा : शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र. मौआम-२००९/प्र.क्र.१५/का.८, दिनांकः ०२.०३.२०१०.

**प्रस्तावना :-**

शासनाने राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनीसाठी वसतीगृहे बांधण्यात येणार असून केंद्र शासनाने राज्यातील ज्या २५ जिल्हयांमधील ४३ शहरे "अल्पसंख्याक बहुल क्षेत्रे" म्हणून घोषित केली आहेत, अशा २५ जिल्हयांमध्ये प्राथम्याने वसतीगृह उभारणी करावयाची आहे. याबाबतचा शासन निर्णय समक्रमांक, दिनांक २ मार्च, २०१० रोजी निर्गमित करण्यात आला आहे. जिल्हाधिकारी, परभणी यांनी पूर्णा नगर परिषदेतर्गत असलेली सर्व्हे क्र. १४ मधील २५ गुंठे जागा अल्पसंख्याक मुलींच्या वसतीगृहासाठी उपलब्ध असल्याचे दि. १०.०३.२०१० च्या पत्रान्वये कळविले आहे. परभणी येथे वसतीगृहाच्या बांधकामासाठी आराखडा व ढोबळ अंदाजपत्रकास (Block estimates) प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

२. परभणी जिल्हयात अल्पसंख्याक समाजातील मुलींच्या वसतीगृहाच्या बांधकामासाठी सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद यांनी नकाशा व जिल्हाधिकारी, वाशिम यांनी सादर केलेल्या ढोबळ अंदाजपत्रकानुसार वसतीगृहाच्या बांधकामासाठी रू.१,४८,०१,२७९/- व फर्निचरसाठी रू. ५९,००,०००/- असा एकूण रू.२,०७,०१,२७९/- इतका खर्च अपेक्षित आहे. वसतीगृहाच्या आराखडयानुसार वसतीगृहाच्या बांधकामासाठी येणा-या रू.२,०७,०१,२७९/- इतक्या खर्चाच्या ढोबळ अंदाजपत्रकास याव्दारे पुढील अटींच्या अधिनतेने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१. वसतीगृहाचे बांधकाम जिल्हाधिकारी यांनी सार्वजनिक बांधकाम विभागाने तयार केलेल्या नकाशा व ढोबळ अंदाजपत्रकानुसार सार्वजनिक बांधकाम विभाग अथवा अन्य एजन्सीकडून करून घ्यावे.

२. निधी उपलब्ध झाल्याशिवाय प्रत्यक्ष बांधकामास सुरूवात करू नये.

३. वसतीगृहामध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा उपलब्ध करून देणे बंधनकारक राहील.

४. वसतीगृहाच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल जिल्हाधिकारी, परभणी यांनी शासनास सादर करावा.

५. सार्वजनिक बांधकाम विभागाने तयार केलेल्या नकाशा व ढोबळ अंदाजपत्रकानुसार प्रत्यक्ष बांधकाम सुरू करण्यापूर्वी जिल्हाधिका-यांनी नकाशा व ढोबळ अंदाजपत्रकास परभणी जिल्हयातील सार्वजनिक बांधकाम विभागाची मान्यता घेवून आवश्यकतेनुसार बदल करावेत. मात्र अशा सुधारित नकाशा व अंदाजपत्रकास शासनाची मान्यता घेण्यात यावी.

३. वसतीगृहाच्या बांधकामासाठी ढोबळ अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे :-

| Sr. | Work Details | Amount in Rs. |
|---|---|---|
| 1 | Civil Cost | 11,770,401 |
| 2 | Add 10% for External Water supply and sanitary arrangement over cost of building | 1,177,040 |
| 3 | Add 9 % for Electrification | 1,059,336 |
| 4 | Add 2 % for Computerisation | 235,408 |
| 5 | Add 4 % for contingencies charges on civil portion | 470,816 |
| 6 | Add 0.75% for MVAT Charges on Civil cost | 88,278 |
| 7 | Furniture & Fixtures | 5,900,000 |
| | Total | 20,701,279 |

४. यावर होणारा खर्च मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यक्रम,(०१) (०८) अल्पसख्याक समाजातील मुलींच्या वसतीगृहांसाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए १४२) ३१- सहाय्यक अनुदान या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २००९-२०१० या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. निधी वितरणाबाबतचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

६. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग पाच अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि. क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(उ.सं. दांडेकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
महालेखापाल, महाराष्ट्र-१,(लेखा व अनुज्ञेयता)मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-१,(लेखा परीक्षा) मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२,(लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र-२,(लेखा परीक्षा) नागपूर
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई
जिल्हाधिकारी, परभणी.
सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव (रोख शाखा), अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रमुख लिपिक, जिल्हाधिकारी कार्यालय,परभणी.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (रोख शाखेमार्फत)
जिल्हा कोषागार अधिकारी,परभणी.
वित्त विभाग,(अर्थसंकल्प-१४, व्यय-४ ) मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग, (कार्या.१४७५).
रोख शाखा व का.७, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, का.-८